



**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

.....................................................................................................................

**प्रशिक्षण**

क्रमांक: कअनि ११२४/प्र.क्र.६०/१४ब दिनांक:- १६ ऑगस्ट, २०२४

**प्रति,**

सह सचिव/उप सचिव (आस्थापना)

सामान्य प्रशासन विभाग/गृह विभाग/महसूल व वन विभाग/कृषि व पदुम विभाग/शालेय शिक्षण व क्रीडा विभाग/वित्त विभाग/ जलसंपदा विभाग/उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग/नियोजन विभाग/पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग/अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय:-राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सन २०२४ मधील प्रशिक्षण**
**कक्ष अधिकारी (गट ब) यांचे पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण**
**नामनिर्देशित कक्ष अधिकाऱ्यांचे प्रशिक्षण रद्द करणेबाबत**

**संदर्भ:-** शासन पत्र समक्रमांक दिनांक ०५.०८.२०२४

**महोदय/महोदया,**

उपरोक्त संदर्भीय पत्र दिनाक ०५.०८.२०२४ अन्वये कक्ष अधिकारी पदावर पदोन्नत झालेल्या व पदोन्नतीनंतरच्या प्रशिक्षणासाठी पात्र असलेल्या कक्ष अधिकाऱ्यांसाठी विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक येथे दिनांक १९.०८.२०२४ ते दिनांक ३०.०८.२०२४ या कालावधीमध्ये ०२ आठवड्यांचे पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण आयोजित करण्यात आले आहे. सदर प्रशिक्षणाकरिता नामनिर्देशित केलेल्या कक्ष अधिकाऱ्यांपैकी खालील तक्त्यात नमूद कक्ष अधिकाऱ्यांची नावे उक्त प्रशिक्षण सत्रामधून वगळण्याबाबतची विनंती संबंधित प्रशासकीय विभाग/कक्ष अधिकारी यांचेकडून प्राप्त झाली आहे.

| अ.क्र. | श्री/श्रीमती | कक्ष अधिकाऱ्यांचे नांव | विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती | श्र.श्री.बोबडे | सामान्य प्रशासन विभाग |
| २. | श्रीमती | स.द.घोडके | सामान्य प्रशासन विभाग |
| ३. | श्रीमती | वि.हं.पाटील | गृह विभाग |
| ४. | श्री | वि.रा.यादव | महसूल व वन विभाग |
| ५. | श्री | गु.श्रा.बल्लाळ | महसूल व वन विभाग |
| ६. | श्री | मो.रा.शेख | महसूल व वन विभाग |
| ७. | श्रीमती | अ.अ.पाटील | कृषि व पदुम विभाग |
| ८. | श्रीमती | यो.अ.देशमुख | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |

| अ.क्र. | श्री/श्रीमती | कक्ष अधिकाऱ्यांचे नांव | विभाग |
|---|---|---|---|
| ९. | श्री | प्र.रा.तानवडे | वित्त विभाग **(प्रतिनियुक्ती)** |
| १०. | श्रीमती | रो.रा.कुंभार | जलसंपदा विभाग |
| ११. | श्री | श्री.द.जिरेवार | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| १२. | श्री | वि.ज्ञा.लाड | नियोजन विभाग |
| १३. | श्रीमती | ते.प. पवार | नियोजन विभाग |
| १४. | श्रीमती | सु.वि.धांडे | नियोजन विभाग |
| १५. | श्री | न.आ.कदम | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग |
| १६. | श्रीमती | चे.गो.दुसाणे | अल्पसंख्याक विकास विभाग |

२. त्यानुषंगाने वर नमूद १६ कक्ष अधिकाऱ्यांची नावे विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक येथे दिनांक १९.०८.२०२४ ते दिनांक ३०.०८.२०२४ या कालावधीत आयोजित केलेल्या प्रशिक्षण सत्रामधून वगळण्यात येत आहेत. तसेच पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण हे राज्य प्रशिक्षण धोरण व महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ अन्वये देण्यात येत असून ते अनिवार्य असल्याने यापुढील प्रशिक्षण सत्रामध्ये उक्त नमूद अधिकारी उपस्थित न राहिल्यास ***महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ मधील नियम ५ मध्ये नमूद केलेल्या तरतूदीनुसार कारवाईस पात्र ठरतील.*** तसेच यापुढील प्रशिक्षण सत्रामधून नाव वगळण्याबाबतची कोणतीही विनंती मान्य करण्यात येणार नाही. सदर बाब संबंधित कक्ष अधिकारी यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावी.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८१६१७४८१०६२०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.16 18:03:49 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:- माहिती व पुढील कार्यवाहीस्तव**

१) संचालक, विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था, नाशिक
२) उप सचिव (कार्या-१२ अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
३) संबंधित अधिकारी (प्रशासकीय विभागामार्फत)
४) निवडनस्ती/प्रशा-२ (१४ब)